**औरंगाबाद मंडळाच्या अधिपत्याखालील वैजापूर उपजिल्हा रुग्णालयातील ११ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.३९/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: २४ एप्रिल, २०१५.

<u>वाचा</u>

**१) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः आरएलएच-१२८७/२१४/आ-४, दि.१६.११.१९८७.**
**२) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः आरएलएच-१०९०/५१९५/आ-४, दि.१६.११.१९९२.**
**३) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः जाबॅप्र-२००३/प्र.क्र.३/जाबॅ/आ-४, दि.२५.०४.२००४**
**४) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०११/प्र.क्र.१०२/आरोग्य-४, दि.२८.०४.२०११.**
**५) शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१४/प्र.क्र.९१/आरोग्य-४, दि.२.०४.२०१४.**
**६) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/१०० खाटा १ उजिरुवैजापुर/अपदे-११/सन२०१५-१६/७८६-७८७/१५, दि.२८.०१.२०१५.**

<u>**शासन निर्णय**</u>

संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयानुसार औरंगाबाद परीमंडळातील १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय, वैजापूर येथील ९५ अस्थाई पदांपैकी ८० टक्के पदे म्हणजेच ८४ पदांचे स्थायीकरण करण्यात आलेले आहे. तसेच संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये औरंगाबाद परीमंडळातील १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय, वैजापूर उपजिल्हा रुग्णालयातील उर्वरित ११ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता सदर ११ अस्थाई पदांना सदर पदे ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नव्हती वा अतिरिक्त कार्यभार दिलेली नाही तसेच तद् अनुषंगिक बाबींच्या त्रुटी आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांची राहील. या अटींच्या अधीन राहून दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (०१)(०९)- महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पातंर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयाचे उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन (२२१० ४६२४) ” व “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (०१)(०८)-प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)” करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ च्या अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४११२७०५८६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.24 13:26:34 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, औरंगाबाद.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
९. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, वैजापूर, जि.औरंगाबाद
१०. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११.अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मडंळतील १९.. खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय वैजापुर येथिल ११ अस्थाई पदे दि.१/३/१५ पासून ते २९/२/१६ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव.

पृ. क्र. ३८

प्रपत्र अ

| शासन निर्णय क्रमांक व दिनांक | पदनाम | संख्या | पदाची वेतनश्रेणी | शाकिय आदेशाने पदे पुढे चालू ठेवण्यात आली त्याचा क्रमांक व दिनाक | ज्या तारखे पासून पुढे चालू ठेवण्याची आहे तो दिनांक | लेखा शिर्ष | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय क्रमांक आरएलएच/१८८७/२१ ४आ-४ दि. १६.११.१९८७ | कक्ष सेवक वर्ग-४ | १ | ४४४०-७४४० | शा.नि.क्र.अपदे-२०१३/प्र.क्र.२२८/ आ-४ मंत्रालय मुंबई -३२ दिनांक २३/०४/२०१३ | १/०३/२०१४ | २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य ,०६ सार्वजनिक आरोग्य , ००१-संचालन व प्रशासन (०१)(०८)-प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालया इतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३) | |
| शासन निर्णय क्र आरएलएच/१०९०/५१ ९५/आ-४ दि.१६.१.९२ | वैद्यकीय अधीकारी वर्ग-२ | १ | १५६००-३९१०० | | | | |
| | अधिपरिचारीका वर्ग-३ | १ | ५२००-२०२०० | | | | |
| | सफाईगार वर्ग-४ | १ | ३९००-३४८०० | | | | |
| | एकुण अ | ४ | | | | | |
| शा.नि.क्र. जॅबॅप्र/२००३/सीआर/३ /जॅबॅक/आ-४ दि.६.११.२००४ | परिसेविका वर्ग -३ | १ | ३९००-३४८०० | | | २२१०-वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य , ०६-सार्वजनिक आरोग्य ००१-संचालन प्रशासन (०१)(७९)-महाराष्ट आरोग्य सेवा विकास प्रकल्पा अंतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयाचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणी वर्धन (२२१०४६२४) | |
| | अधिपरीचारीका वर्ग-३ | ४ | ३९००-३४८०० | | | | |
| | आपघात विभाग सेवक वर्ग-४ | १ | ४४४०-७४४० | | | | |
| | कक्ष सेवक वर्ग-४ | १ | ४४४०-७४४० | | | | |
| | एकुण ब | ७ | | | | | |
| | एकुण अ + ब | ११ | | | | | |